हंगाम २०२०-२१ मधील धान तांदूळ
वाहतुकीचे दर निश्चित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्र.वि.स.उ.स./का.२(ख)/CMR वाहतूक/२०२०-२१**
**८ वा मजला, गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,**
**लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०००01.**
**दि.०२/११/२०२१**

वाचा: १. शासन परिपत्रक क्र.वि.स.उ.स./धा.तां.वा./२०१९-२०/का.२, दि.०८.०७.२०२०
२. दि.०६.१०.२०२१ रोजीची मा.मंत्री मंडळ बैठक.
३. शासन पत्र क्र. अधापु-२०२१/प्र.क्र.२१/ना.पु.२२ दिनांक ०५ मार्च, २०२१
४. शासन पत्र क्र. अधापु-२०२१/प्र.क्र.२१/ना.पु.२२, दिनांक २२ एप्रिल,२०२१
५. शासन पत्र क्र. अधापु-२०२१/प्र.क्र.२१/ना.पु.२२, दिनांक २३ एप्रिल,२०२१
६. शासन पत्र क्र. अधापु-२०२१/प्र.क्र.२१/ना.पु.२२, दिनांक २१ मे,२०२१
७. शासन पत्र क्र. अधापु-२०२१/प्र.क्र.२१/ना.पु.२२, दिनांक २९ जुलै,२०२१

**शासन परिपत्रक:-**

खरीप पणन हंगाम २०२०-२१ अंतर्गत १३६.७६ लक्ष क्विंटल व रब्बी पणन हंगाम २०२१-२२ अंतर्गत ५३.१५ लक्ष क्विंटल अशी एकूण १८९.९१ लक्ष क्विं इतकी धान खरेदी करण्यात आलेली आहे. सदर धानापासून सीएमआर (तांदूळ) तयार करुन घेणेकरीता धान व तयार होणाऱ्या सीएमआरची वाहतूक करण्यात आली आहे.

संदर्भांकित शासन पत्र क्र.३ ते ७ अन्वये उपरोक्त प्रमाणे तयार झालेला सीएमआर (तांदूळ) लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वाटपाकरीता जिल्हानिहाय उचल करणेकरीताचे आदेश देण्यात आलेले आहेत. सबब, त्यानुसार करण्यात आलेल्या धान व सीएमआर वाहतूकीकरीता दर मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

हंगाम २०२०-२१ करीता किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी करण्यात आलेला धान व त्यापासून तयार होणारा तांदूळ (सीएमआर) वाहतूकीकरीता संदर्भांकित क्र.१ च्या परिपत्रकान्वये हंगाम २०१९-२० मधील धान व तांदूळ (सीएमआर) वाहतूकीकरीता मंजूर करण्यात आलेले दर लागू करणेबाबत मा. मंत्री मंडळाच्या दि.०६.१०.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे.

हंगाम २०२०-२१ करीता किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी करण्यात आलेला धान व त्यापासून तयार होणारा तांदूळ (सीएमआर) वाहतूकीकरीता पुढीलप्रमाणे दर मंजूर करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | वाहतूकीचे अंतर | सन २०२०-२१ चे दर |
|---|---|---|
| १ | ०.१ कि. मी ते ५ कि.मी. | रु.५.९३/- संपूर्ण अंतरा करीता |
| २ | ५.१ कि. मी ते १० कि.मी. | रु.१.१९/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ३ | १०.१ कि. मी ते २० कि.मी. | रु.०.८२/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ४ | २०.१ कि. मी ते ४० कि.मी. | रु.०.७१/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ५ | ४०.१ कि. मी ते ६० कि.मी. | रु.०.५९/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |
| ६ | ६०.१ कि.मी. पेक्षा जास्त | रु.०.४७/- प्रति क्विं. प्रति कि. मी. |

प्रस्तुत दर हे शासन आदेशानुसार गोंदिया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, नागपूर या जिल्ह्यातील निश्चित केलेल्या बेस गोदामांपासून ते सीएमआरची वाहतूक करणाऱ्या जिल्ह्याच्या निश्चित केलेल्या सिमेपर्यंतच्या अंतराच्या सीएमआर वाहतूकीस तसेच, मिलर ने खरेदी केंद्र ते मिल पर्यंत केलेल्या धान वाहतूकीस व मिल ते बेस गोदामापर्यंत केलेल्या सीएमआर वाहतूकीस लागू राहतील. तसेच, केंद्र शासनाच्या इतर कल्याणकारी योजनांसाठी शासनाच्या आदेशानुसार सीएमआर वाहतूक केली असेल तर त्याला ही हे दर लागू असतील.

सदरचा खर्च या विभागाच्या स्विय प्रपंजी लेख्यामधून मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार साठवणूक यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न, १०१- प्रापण व पुरवठा, (०२) प्रापण व वितरण व किंमत नियंत्रण (०२)(१३) मुंबई शहर किमान आधारभूत किंमत योजनेखालील भरडधान्य/ धान वरील अनुषंगिक खर्च(अनिवार्य)(४४०८०३९१) ५०, इतर खर्च या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

केंद्रशासनाकडुन प्राप्त प्रतीपुर्तीची रक्कम मागणी क्र. एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८ अन्न साठवण व वखार साठवण यांवरील भांडवली खर्च,०१-अन्न,९००,भांडवली लेख्यावरील जमा व वसुली,(०३)प्रापण वितरण व किंमत नियंत्रण,(०३) (०१) मुंबई शहर किमान आधारभुत योजनेखालील जमा व वसुली (अनिवार्य) (४४०८०४०६) ७०,वजा वसुली. या लेखाशिर्षाअंतर्गत जमा करण्यात यावी.

तसेच, राज्य शासनावरील भाराच्या रकमेची प्रतिपूर्ती लेखाशिर्ष २४०८ ०५३८ खाली करण्यात यावी.

सदरचा शासन परिपत्रक वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५९/व्यय-१० दि.२९.१०.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२१११०२१२४७२५२५०६ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Abhay Dongar Dhande

Digitally signed by Abhay Dongar Dhande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=4000001, st=Maharashtra, 2.5.4.20=da21a70357404b356571c7082a767be6020327a0e32cf1d6b6fc6accdf98c18d, serialNumber=8cca0ae308227887c4504b21e5b7e00473de5551baf05a30ca1faf3de13e964a, cn=Abhay Dongar Dhande
Date: 2021.11.02 12:48:41 +05'30'

**( अभय धांडे )**

**वित्तीय सल्लागार व उप सचिव**

**प्रति,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कन्मुर हाऊस, मुंबई-४००००९.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., आदिवासी विकास भवन, जुना आग्रा रोड, नाशिक-४२२००१.
३. सहसचिव (एम.एस.पी), अ.ना.पु व ग्रा. सं. विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा), सर्व विभाग.
५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी.